केंद्र पुरस्कृत प्रधान मंत्री कृषि सिंचन योजना, प्रति थेंब अधिक पीक योजनेकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त निधी वितरीत करणेबाबत. **(लेखाशिर्ष २४०१ A६१९ ) ( केंद्र हिस्सा )**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र.क्र.७ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
तारीख: - १ ऑक्टोबर, २०१९.

वाचा -

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि. ०१.०४.२०१९.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि. ०८.०७.२०१९.
३) कृषि व पदुम विभाग, नस्ती क्र. प्रकृसिं- ०११९ / प्र. क्र. ४१/भाग-३/ १४-अे.

**शासन निर्णय-**

राज्यात केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना, प्रति थेंब अधिक पीक योजनेंतर्गत मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपाययोजना, (०१) (२७) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पिक ( केंद्र पुरस्कृत योजना) ( केंद्र हिस्सा ६०% ) ( २४०१ A६१९ ), ३३ अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता रु. ३०२६.७६ लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीपैकी केंद्र शासनाने रु. १७४०.०० लाख एवढा निधी वितरित केला आहे.

२. कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरुन सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता प्रधान मंत्री कृषि सिंचन योजना, प्रति थेंब अधिक पीक योजनेकरिता ( केंद्र हिस्सा ६०% ) ( २४०१ A६१९ ), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. १७४०.०० लाख ( अक्षरी रुपये सतरा कोटी चाळीस लाख फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव (कृषी), कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्र, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्र तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तीक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. उपरोक्त योजनेंतर्गत केंद्र हिश्यास समरुप राज्य हिस्सा जिल्हा योजनेंतर्गत वितरीत करण्यात आलेला असल्याने सदरहू निधी संबंधित यंत्रणेकडून उपलब्ध करुन घेण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. राज्यात दि. २१.०९.२०१९ रोजी पासून घोषित आदर्श आचार संहितेचा भंग होणार नाही याबाबत संबंधित विभागाने दक्षता घ्यावी.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201910011322358324 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2019.10.01 17:54:28 +05'30'

किरण कि. पवार
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे .
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग